**मुख्य वनसंरक्षक (प्रा.), गडचिरोली व वनसंरक्षक, कार्य आयोजना, गडचिरोली यांचे कार्यालयाकरीता प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाच्या अनुषंगाने नक्त वर्तमान मूल्य (NPV) व पर्यायी वनीकरणाकरीता निधी उपलब्ध करुन देणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-इएसटी-२०१४/प्र.क्र.२६०/फ-९,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २० मे, २०१७

<u>वाचा</u> :- १. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०१०/प्र.क्र.१०४/फ-९, दिनांक ३१.१२.२०१०
२. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक संकिर्ण २०१०/प्र.क्र.१०४/फ-९, दिनांक ०१.१०.२०१२
३. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०१०/प्र.क्र.१०४/फ-९, दिनांक २२.०१.२०१३.
४. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक इएसटी-२०१४/प्र.क्र.२६०/फ-९, दिनांक १२.२.२०१५
५. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक-इएसटी-२०१४/प्र.क्र.२६०/फ-९, दिनांक २६.९.२०१६.
६. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८.४.२०१७
७. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्र. कक्ष १/पी/यो/नबाप्र/प्र.क्र. १८/२१३/१७-१८, दि. ९.५.२०१७ चे पत्र.

**<u>प्रस्तावना:-</u>**

विदर्भाच्या विकासाची गती वाढविण्याच्या दृष्टीने शासनाने दिनांक ०३.०२.२०१० च्या शासन निर्णयान्वये विदर्भ विकास कार्यक्रम २००९ जाहीर केलेला आहे. शासनाने या कार्यक्रमामध्ये गडचिरोली जिल्हयातील नक्षलग्रस्त भागासाठी विशेष कृती कार्यक्रम राबविण्याचे निश्चित केले आहे. त्यानुसार गडचिरोली जिल्हयातील वनविभागाचे प्रशासन सक्षम करण्यास दिनांक ३१.१२.२०१० च्या शासन निर्णयान्वये वनसंरक्षक (प्रा.), गडचिरोली वनवृत्त व वनसंरक्षक कार्यआयोजना क्र.२ गडचिरोली यांचे कार्यालय व निवासी इमारतीच्या अवस्था-१ च्या रु.१५२३.९८ लाख इतक्या निधीच्या अंदाजपत्रकास व आराखडयास सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अटी व शर्तीस अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यामध्ये नक्त वर्तमान मूल्य (NPV) व पर्यायी वनीकरणाकरीता लागणा-या रकमेचा समावेश नाही. परंतु सन

२०११-१२ मध्ये बांधकामासाठी रु.२७०.३३ लक्ष इतके अनुदान उपलब्ध करुन दिल्यानंतर त्यातील नक्त वर्तमान मूल्य (NPV) करीता रु.६६.५७ लक्ष व पर्यायी वनीकरणाकरीता रु.५४.८४ लक्ष इतकी रक्कम Ad-hoc CAMPA नवी दिल्ली यांच्याकडे जमा केलेली आहे. सदर रकमेची प्रतिपूर्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

वार्षिक योजना सन २०१७-१८ राज्य योजनेअंतर्गत मुख्य वनसंरक्षक (प्रा.), गडचिरोली व वनसंरक्षक, कार्य आयोजना, गडचिरोली यांचे कार्यालयाकरीता प्रशासकीय इमारतीचे बांधकाम करण्यासाठी नक्त वर्तमान मूल्य (NPV) व पर्यायी वनीकरणाकरीता एकूण खर्च केलेल्या रु.१२१.४१ लक्ष इतक्या निधीची प्रतिपूर्ती करण्यासाठी (४४०६ ००२६) या लेखाशिर्षाअंतर्गत विहीत केलेल्या अटी व शर्तीस अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर तरतूद खर्च करतांना वित्त विभागाने वेळो वेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे. वन (संवर्धन) अधिनियम १९८० अंतर्गतच्या तरतूदीचा भंग होणार नाही, याची दक्षता घ्यावी.
२. प्रत्यक्ष खर्च करण्यापूर्वी विहीत पध्दतीचे पालन करावे व आवश्यकतेनुसार आहरण करावे.
३. सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक १८.४.२०१७ च्या परिपत्रकातील व त्यासोबतच्या परिशिष्टामध्ये नमूद केलेल्या अटीची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.
४. सदर मंजूरीस शासन निर्णय क्रमांक एमएससी- २०११/प्र.क्र. १७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

उपरोक्त खर्च मागणी क्रमांक सी-१०, प्रधान लेखाशिर्ष ४४०६, वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च, राज्य योजना अंतर्गत योजना, (०१) वनीकरण, (०७०) दळणवळण व इमारती, (००) (०२) वनातील इमारती बांधकाम (४४०६ ००२६) या लेखाशिर्षाखाली सन २०१७-१८ करिता उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक १८.०४.२०१७ च्या परिपत्रकान्वये तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५२२१६५४२५१४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Sujay Dodal

Digitally signed by Sujay Dodal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, cn=Sujay Dodal
Date: 2017.05.22 17:02:42 +05'30'

**(सुजय दोडल)**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) गडचिरोली / वनसंरक्षक, कार्यआयोजना, गडचिरोली.
४. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
५. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत-३), मंत्रालय, मुंबई-३२.
६. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-३२.
७. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
८. फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२. (निवडनस्ती)